**अहेरी पोलीस जिल्ह्यासाठी निर्माण करण्यात आलेले पोलीस अधीक्षकाचे पद पोलीस उपआयुक्त या पदामध्ये रुपातंरीत करुन ते पोलीस आयुक्त, नागपूर यांच्या आस्थापनेवर स्थानांतरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-२८१६/प्र.क्र.१४८/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ११ नोव्हेंबर, २०१६

<u>वाचा :-</u>

१) गृह विभाग शासन निर्णय क्र.अेपीओ-२८०९/७४९/प्र.क्र.२९०/पोल-३,दि.३१.१२.२००९
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५
३) गृह विभाग, शासन आदेश क्र.रापोसे-०७१६/प्र.क्र.६७ (१)/पोल-१अ, दि.०१.१०.२०१६
४) कक्ष अधिकारी, पोल-१अ, गृह विभाग यांचे पत्र क्र.रापोसे-०७१६/प्र.क्र.६७/पोल-१अ, दि.०३.१०.२०१६

<u>**प्रस्तावना :-**</u>

वित्त विभागाने उपरोक्त संदर्भाधिन क्र.०२ येथील नमूद दिनांक ०२.०६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाला प्रशासनावर कोणताही विपरीत परिणाम न होता, विभागामध्ये एकुण उपलब्ध कर्मचाऱ्याचे समायोजन करण्याचे संपुर्ण अधिकार राहतील. विभागाच्या ज्या संवर्गाच्या बाबतीत कामांची आवश्यकता कमी झाली आहे, अशा संवर्गातील पदांची विभागातील तीच वेतनश्रेणी असलेल्या दुसऱ्या संवर्गात आवश्यकतेनुसार पदे स्थानांतरण करण्यात येतील. तथापि त्या विभागातंर्गत एकुण पद संख्येच्या मर्यादेतच असे समायोजन राहील, अशी तरतुद केली आहे. सदर तरतुदीनुसार उपरोक्त संदर्भाधिन क्र.०१ येथे नमूद दिनांक ३१.१२.२००९ च्या शासन निर्णयान्वये अहेरी पोलीस जिल्ह्यासाठी निर्माण करण्यात आलेले पोलीस अधीक्षकाचे पद पोलीस उपआयुक्त या पदामध्ये रुपातंरीत करुन ते पोलीस आयुक्त, नागपूर शहर यांच्या आस्थापनेवर स्थानांतरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

अहेरी पोलीस जिल्ह्यासाठी उपरोक्त संदर्भाधिन क्र.०१ येथे नमूद दिनांक ३१.१२.२००९ च्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेले पोलीस अधीक्षकाचे पद पोलीस उप आयुक्त या पदामध्ये रुपातंरीत करुन ते पोलीस आयुक्त, नागपूर शहर यांच्या आस्थापनेवर स्थानांतरण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११११४४७३२७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhiraj K Abhang

Digitally signed by Dhiraj K Abhang
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b83edfcbaa0fddb5983e8303bccd9a96ef7cc55853b8b449ff8dc53d69f1618d, cn=Dhiraj K Abhang
Date: 2016.11.11 14:50:03 +05'30'

**( धीरज कां. अभंग )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री,गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस आयुक्त,नागपूर शहर.
८. विशेष पोलीस महानिरीक्षक, नागपूर परिक्षेत्र.
९. पोलीस अधीक्षक,गडचिरोली.

१०.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.

११.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/गडचिरोली.

१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.

१३.वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१.

१४.निवड नस्ती, पोल-३.